# डॉ. मिराशी व (पु. ना.) ओक यांचा वाद -

# E Book 183

हे स्तंभ नक्कीच हिंदूंचे कार्य होते आणि (तरीही) ते जैन किंवा (ब्राह्मणवादी) {म्हणजे कसे ?} असू शकतात.

आधी पूर्ण श्रेय हिंदूंना द्यायचे व पुढल्या वाक्यात संशय दाखवून पाचर मारायची हे तंत्र कनिंगहॅम यांच्या प्रचंड शोधकार्यातील वैगुण्य मानावे लागेल. अशीच मखलाशी दिल्लीतील कुतुबमिनार वास्तूचे शोधकार्याचे वर्णन करताना जनरल कनिंगहॅम यांनी केलेली दिसते.

Written by लोकसत्ता टीम डॉ.. राजेंद्र डोळके
rajendradolke@gmail.com

Updated: June 12, 2022 14:24 IST





बटेश्वर नामक गाव, मंदिरसमूह आग्र्याजवळ ६८ किमीवर आहे.

- ❖ डॉ.. मिराशी व ओक यांचा वाद १९६७ मध्ये सुरू झाला. नागपूरच्या ‘तरुण-भारतातून या विषयावर दोघांचीही उत्तरे-प्रत्युत्तरे झाली. ओकांचे या विषयावर नागपुरात व्याख्यानही झाले. तसेच मिराशींनी या विषयावर ‘नागपूर-टाइम्स’मधून इंग्रजीत लिखाण केले...
- ❖ शिलालेख ‘परमर्दीदेवाच्या काळातील बघारी शिलालेख’ असा आता ओळखला जात असून तो बटेश्वरचा नसून बघारीचा आहे हे आता सर्वमान्य झाले आहे. बघारी हे गाव हमीदपूर जिल्ह्यातील चंदेलांची राजधानी महोबा (महोत्सवपूर) हिच्याजवळ आहे.
- ❖ प्रस्तुत शिलालेख बघारी येथे सापडणे अगदी शक्य आहे. कारण परमर्दी राजा हा चंदेल वंशातीलच होता. तेथे चंदेलांचे मंत्री सल्लक्षण व पुरुषोत्तम यांनी भगवान विष्णू व शिव यांची मंदिरे उभारली असणे सुतराम शक्य आहे.

*ताजमहाल या जगप्रसिद्ध ऐतिहासिक वास्तूमधील २२ खोल्या उघडाव्यात आणि तिथे काय आहे याचे सर्वेक्षण करावे ही मागणी न्यायालयाने फेटाळून लावली आणि ताजमहाल पुन्हा चर्चेत आला. तसे त्याबद्दलचे वाद नवे नाहीत. अधूनमधून ते डोके वर काढतच असतात. ही अप्रतिम आणि नयनरम्य इमारत शहाजहां*

बादशहाने आपल्या प्रिय पत्नीच्या स्मृत्यर्थ सोळाव्या शतकात आग्र्याला बांधली हे जगप्रसिद्ध आहे. लहानपणापासून शाळा-कॉलेजात तसेच शिकवले जाते. परंतु ते तसे नसून मुळात ते प्राचीन शिवमंदिर होते या मताचा पुरुषोत्तम नागेश ओक यांनी वारंवार पाठपुरावा केला. त्यांनी आपल्या मताच्या समर्थनार्थ काही पुरावे सादर केले व अनुमानेही केली. त्यांचे 'ताजमहल : द ट्रू स्टोरी' हे या विषयावरचे पुस्तक प्रसिद्ध असून ओकांचे म्हणणे मान्य असणारे लोक त्या पुस्तकाचा हवाला देत असतात. परंतु ओकांनी पुढे केलेल्या पुराव्याचे सप्रमाण व विस्तृत खंडन आंतरराष्ट्रीय ख्यातीप्राप्त शिलालेखतज्ज्ञ व इतिहास संशोधक डॉ. वा. वि. मिराशी यांनी केले, हे फारच थोडय़ा लोकांना माहीत असल्याचे दिसते. कारण आज टी.व्ही.वर, यू-ट्यूबवर या विषयावर जेवढय़ा चर्चा ऐकायला मिळतात त्यात मिराशींचा पुसटसा उल्लेखदेखील कुठे आढळत नाही. डॉ. मिराशींचे एवढे महत्त्वाचे संशोधन विस्मरणात चालले आहे की काय असे वाटते. ते तसे जाऊ नये व या चर्चेच्या संदर्भात दुसराही पक्ष लोकांना कळावा, म्हणूनच या लेखाचा प्रपंच.

हा वाद तेथे थांबला असे वाटत असतानाच ओक यांनी 'धर्मभास्कर' मासिकाच्या मार्च १९७५ च्या अंकात तोच वाद पुन्हा उकरून काढून प्रतिपक्षाची म्हणजे डॉ.. मिराशींची यथेच्छ निंदा व हेटाळणी केली व 'आपले मत सर्वास पसंत पडले' अशी आत्मप्रौढी मारली. त्या लेखाला डॉ. मिराशींनी 'ओकांच्या संशोधनातील दुराग्रह' व 'बटेश्वर शिलालेख आणि  ओकांची सत्यनिष्ठा' या शीर्षकाचे दोन लेख लिहून प्रत्युत्तर दिले. या दोघांच्याही लेखांच्या आधारे दोन्ही पक्षांचे म्हणणे येथे सादर करतो.

बटेश्वर शिलालेख

ओक यांनी ताजमहाल हे मूळचे हिंदु मंदिर आहे हे दाखविण्याकरिता प्रामुख्याने बटेश्वर शिलालेखाचा आधार घेतला. त्या शिलालेखात चंदेल राजा परमर्दी याच्या मंत्र्याने एक विष्णूचे व दुसरे शंकराचे अशी दोन मंदिरे बांधल्याचा उल्लेख आला आहे. शंकराचे मंदिर 'स्फटिकावदात' (स्फटिकाप्रमाणे शुभ्र) होते असे त्यात वर्णन आहे. झाले! ओकांना पाहिजे होता तसा हा पुरावा मिळाल्यामुळे त्यांनी 'स्फटिकावदात' म्हणजे 'संगमरवरी' असा अर्थ करून या वर्णनाचा ताजमहालाशी बादरायण संबंध जोडला आणि शिलालेखात उल्लेखिल्याप्रमाणे शंकराचे शुभ्र मंदिर

म्हणजेच ताजमहाल अशी आरोळी ठोकली. वास्तविक त्या शिलालेखाचा ताजमहालाशी मुळीच संबंध नाही. कसे ते पुढील विवेचनावरून कळून येईल.

आग्रा आणि बटेश्वर यांचा संबंध

बटेश्वर हे गाव आग्र्याच्या आग्नेय दिशेस ३५ मैलांवर असून ते यात्रेचे ठिकाण आहे. कोणताही शिलालेख हा ज्या राजाशी अथवा स्थानाशी संबंधित असतो त्या राजाच्या राजधानीच्या अथवा आजूबाजूच्या परिसरातच सापडत असतो. ओकांना या लेखाचे ताजमहालाशी व पर्यायाने आग्र्याशी अत्यंत जवळचा संबंध दाखविणे आवश्यक असल्यामुळे त्यांनी बटेश्वर हे गाव आग्र्यापासून तीन मैलांवर आहे असे लिहिले. ओकांच्या विधानातील असत्यता दाखविण्यासाठी मिराशींनी त्या शिलालेखाच्या उपलब्धीचा इतिहासच आपल्या लेखात सांगितला. ते लिहितात, ".. तो (शिलालेख) आग्र्यापासून ३५ मैलांवर बटेश्वर येथे कनिंगहॅमला सुमारे नव्वद वर्षांपूर्वी आढळला, असे म्हणतात. कीलहॉर्नने एपिग्राफिया इंडिका या कोरीव लेखांच्या प्रकाशनास वाहिलेल्या नियतकालिकाच्या पहिल्या पुस्तकात (प्रकाशन काल १८८८ ते १८९२) तो प्रसिद्ध केला आहे. यात वर्णिलेल्या मंदिरांचा ताजमहालाशी बादरायण संबंधही जोडणे शक्य नाही, हे आम्ही सात वर्षांपूर्वी ओकांच्या निदर्शनास आणले होते. तरीही ते आपल्या पूर्वीच्याच मताची री ओढत आहेत." ('संशोधनमुक्तावली', सर ७, पृ. २१५) पुढे मिराशींनी 'बटेश्वर हे आग्र्यापासून चार मैलांवर आहे, ही ओकांची शुद्ध लोणकढी थाप आहे' असे लिहिले आहे. (तत्रव, पृ. २१९)

याला उत्तर देताना ओक लिहितात, "... बटेश्वर नावाचे मंदिर आजही आग्र्यात आहे. त्याच नावाचे दुसरे ३५ मैलांवरही असेल. अर्थात बुल्हर (पाश्चात्त्य संशोधक) यांनी तो शिलालेख त्यांना स्वत:ला ३५ मैलांवर मिळाला असे म्हटले असल्यास शंका घेण्याचे काहीच कारण नाही." (तरुण भारत, दि. ३०/१२/१९६७) येथे त्यांनी बुल्हरचे म्हणणे मान्य केलेले दिसते. तरीपण शिलालेख आग्र्याजवळच सापडला हे त्यांना सिद्ध करायचे असल्यामुळे त्यांनी आपल्या पूर्वीच्याच म्हणण्याचे निसरडे समर्थन केले आहे. 'धर्मभास्कर'च्या मार्च १९७५ च्या अंकात ते म्हणतात, "आग्र्याच्या काही रहिवाशांच्या मते ताजमहालपासून चार मैलांवर एक बटेश्वर असून तेथे दरवर्षी यात्रा असते." ओकांच्या या म्हणण्याला मिराशींनी पुन्हा आव्हान दिले. ते लिहितात, "एखाद्या स्थळाचे अस्तित्व कोणाच्याही मतावर अवलंबून नसते.

*आग्र्याच्या कोणत्या दिशेला चार मैलांवर हे बटेश्वर गाव आहे हे  ओकांनी निश्चितपणे सांगावे” (सं.मु. सर ७, पृ. २१९)*

*ओकांना मिराशींचे हे आव्हान स्वीकारणे शक्य झाले नाही, हे सांगावयास नकोच. तरीपण शिलालेख आग्र्याजवळ सापडला हे तर त्यांना दाखविणे भागच होते. कारण बटेश्वरचा आणि आग्र्याचा निकटचा संबंध दाखविला नाही तर ज्या पायावर त्यांनी आपल्या कल्पनेची इमारत उभी केली तो पायाच उखडून पूर्ण इमारतच कोसळून पडणार. म्हणून त्यांनी ‘हा दगड कोणातरी (मुसलमानाने?) आग्र्याहून तेथे नेऊन लपविला असावा’ अशी क्लृप्ती शोधून काढली. ते लिहितात, “... मुस्लीम राज्यकर्त्यांनी  इकडचे दगड तिकडे नेऊन हिंदु महाल-मंदिरांच्या दगडांनीच आपल्या महा-मशिदी बांधल्या.” (त.भा., तत्रव)*

*याप्रमाणे ओकांच्या प्रतिपादनातील अनेक चुका डॉ. मिराशींनी त्यांच्या लक्षात आणून दिल्या आहेत. शिलालेखातील अनेक अर्थ ओकांनी चुकीचे लावले आहेत. इतर अनेकांनी त्यांचे योग्य अर्थ दिले असताना कोणाचेही अर्थ न स्वीकारण्याचा हटवादीपणा त्यांनी केलेला आहे. शिलालेखाचा काळ, विष्णू, शंकर, प्रासाद, मंदिर इत्यादींचा त्यांनी लावलेला अर्थ चुकीचा आहे हे अनेकांनी लक्षात आणून दिल्यानंतर, त्या सर्वांनाच ओकांनी चूक ठरविले आहे. त्याची प्रचीती येण्याकरिता दोन्ही पक्षांचे लेख मुळातूनच वाचणे आवश्यक आहे. लेखमर्यादेत ते देणे शक्य नाही.*

*शिलालेख बटेश्वरचा नव्हेच*

*पुढे मिराशींनी या विषयाचे आणखी संशोधन केले व नवीन पुरावे समोर आणले. त्यांच्या विवेचनातील सारांश पुढे देतो. (सं.मु. सर ७, पृ. २२५ ते २३०) या लेखात बटेश्वरचा शिलालेख असे नाव चुकीचे पडले होते. कीलहॉर्नने तो याच शीर्षकाखाली एपिग्राफिया इंडिका, व्हॉ. १ (पृ. २०७-२१४) मध्ये संपादिला आहे, पण आपल्या प्रस्तावनेच्या आरंभी त्याने ‘हा शिलालेख बटेश्वर येथे सापडला काय’ याविषयी मला संशय आहे, असे म्हटले आहे. हा शिलालेख कनिंगहॅमला बघारी येथे एका तळ्याच्या काठी दोन तुकड्यात सापडला. तेथून तो सुरक्षित राहण्यासाठी लखनौच्या म्युझियममध्ये नेण्यात आला असे दिसते. सध्या तो लखनौ म्युझियममध्ये आहे. या शिलालेखावर २४ ओळी संस्कृतमध्ये आहेत. यात चंदेला वंशातील मदनवर्मा, त्याचा पुत्र यशोवर्मा व नंतर त्याचा पुत्र परमर्दी यांचे वर्णन आले आहे. या लेखाचा उद्देश परमर्दीदेव राजाचा मंत्री सल्लक्षण याने एक विष्णूचे व दुसरे*

स्फटिकावदात (स्फटिकाप्रमाणे शुभ्र) असे शंकराचे अशी दोन मंदिरे बांधण्यास आरंभ केला होता. विष्णूचे मंदिर पूर्ण झाले, पण शंकराचे मंदिर त्याच्या हयातीत अपूर्ण होते. ते त्याचा पुत्र आणि चंदेल परमर्दीदेवचा मंत्री पुरुषोत्तम याने पूर्ण केले हे नमूद करण्याचा होता. लेखाच्या शेवटी विक्रम संवत १२५२ (११९५-९६) चा निर्देश आला आहे.

या प्रमाणांवरून प्रस्तुत शिलालेख 'परमर्दीदेवाच्या काळातील बघारी शिलालेख' असा आता ओळखला जात असून तो बटेश्वरचा नसून बघारीचा आहे हे आता सर्वमान्य झाले आहे. बघारी हे गाव हमीदपूर जिल्ह्यातील चंदेलांची राजधानी महोबा (महोत्सवपूर) हिच्याजवळ आहे. प्रस्तुत शिलालेख बघारी येथे सापडणे अगदी शक्य आहे. कारण परमर्दी राजा हा चंदेल वंशातीलच होता. तेथे चंदेलांचे मंत्री सल्लक्षण व पुरुषोत्तम यांनी भगवान विष्णू व शिव यांची मंदिरे उभारली असणे सुतराम शक्य आहे.

ओक शिलालेखातील ज्या शिवमंदिराचा उल्लेख करतात ते हे बघारी येथील शिवमंदिर आहे. आग्ऱ्याचा आणि ताजमहालाचा त्याचा अजिबात संबंध नाही. आणि म्हणून 'हा शिलालेख मूळचा ताजमहालाच्या परिसरातील असून कोणीतरी बटेश्वर येथे नेऊन लपवून ठेवला होता, हे ओकांचे विधान पूर्णपणे असत्य ठरले आहे', असे डॉ. मिराशी म्हणतात. (सं.मु. सर ७, पृ. २२६) 'ताजमहाल हे प्राचीन भारतीय राजमंदिर आहे' त्या तथाकथित बटेश्वर शिलालेखावरून सिद्ध करण्याचा ओक यांच्या खटाटोपाला 'संशोधन क्षेत्रातील भ्रष्टाचार' असेही मिराशींनी म्हटले आहे. (पृ. २३०, २३१)

समारोप

अशा रीतीने आपल्या सिद्धांतावर ओक यांनी जो प्रमुख आधार घेतला आहे, त्या आधाराचा आणि त्या सिद्धांताचा यत्किंचितही संबंध नाही हे मिराशींनी सिद्ध केलेले दिसते. ओकांच्या इतरही तर्कांना आणि अनुमानांना त्यांनी उत्तर दिले आहे. ते सर्व या ठिकाणी देणे शक्य नाही. पण ओकांच्या या तर्कटाबद्दल (हा मिराशींचा शब्द) काही महत्त्वाची माहिती येथे देण्याचा मोह मात्र आवरत नाही. मिराशी लिहितात-

"... ओक यांनी या विषयावर नागपुरात व्याख्यान दिले होते. त्यावेळी त्यांना येथे विरोध झाला होता. अखिल भारतीय इतिहास परिषदेच्या एका अधिवेशनात

*‘ताजमहाल हा राजपुतांचा राजवाडा आहे’, यावरील अभिनव संशोधनाचा लेख वाचण्यास त्यांना परवानगी मिळाली नव्हती. भारतीय इतिहासतज्ज्ञ त्यांच्या संशोधनाची अनुल्लेखाने उपेक्षा करीत. (पृ. २१३)…“ ओक हे आपल्या पुस्तकात व लेखांत असे विधान ठासून करतात की शहाजहांने ताजमहाल बांधलाच नाही, हे त्यांचे विधान कसे असत्य आहे हे डॉ. आर. नाथ यांनी मुंबईच्या इलस्ट्रेटेड विकलीच्या ८ जून १९७५ च्या अंकात (पृ. ३२-३५) सप्रमाण दाखवून दिले आहे. त्यांनी शहाजहांच्या पाच फर्मानांचा उल्लेख करून त्यातील तीन फर्मानांची छायाचित्रेही दिली आहेत. त्यावरून ताजमहालाकरिता शहाजहांने जयपूरच्या मिर्झा राजा जयसिंगामार्फत १६३२ पासून पाच वर्षेपर्यंत मकरानहून संगमरवरी शिळा आणविल्या होत्या व कुशल कारागीरही बोलाविले होते असे स्पष्ट दिसते. तेव्हा याबाबतीतही ओकांचे विधान पूर्णपणे असत्य ठरले आहे. जिज्ञासूंनी हा लेख अवश्य वाचावा.” (पृ. २३०).*

--------

वरील लेख मिसळपाव. कॉमवर (प्रस्तूत लेखक विंग कमांडर शशिकांत ओक यांना) वाचायला मिळाला. दोन्ही विचारकांची मते आणि मतांतरे स्वतंत्रपणे शोधायला त्यानी पुढाकार घेतला. त्या शोधकार्याचा आढावा सादर करत आहे. प्रस्तूत लेखक पु.ना. ओकांचा पुतण्या आहे. ‘ताजमहालावर नवा प्रकाश’ या निबंध लेखनातून त्यांनी ताजमहाल कोणी बांधला या प्रश्नातून निर्माण होणाऱ्या ताणतणावाला बाहेर ठेवून ताज महाल वास्तू ही एक अद्वितीय सिव्हिल इंजिनियरिंगचा नमुना म्हणून पाहिला व अभ्यासला जावा असे प्रतिपादन करतो. डॉ. मिराशी यांनी सादर केलेले पुरावे नकाशांच्या मदतीने कसे कळतात यावर प्रकाश टाकायचा प्रयत्न केला आहे.

सध्याच्या काळात विशेषकरून श्रीराम मंदिराची वास्तू अयोध्येत निर्माण झाली आहे. त्या शिवाय वकील शंकर जैन यांनी ज्ञानवापीचे उत्खनन किंवा पुरालेख खात्याकडून आधुनिक उपकरणे वापरून सत्य शोधन कार्याला माननीय हायकोर्टाने आज्ञा दिल्यानंतर हे लिखाण होत आहे. म्हणून ताज महालाबाबत बहुचर्चित बंद खोल्यातून शोध कार्य करायला परवानगी मिळेल असा रागरंग दिसू लागला आहे. त्यात काय  सापडेल/मिळेल त्यावर नंतर लिहिता येईल. आत्ता फक्त डॉ. मिराशींनी सादर केलेल्या पुराव्यांवरून दिसणारे चित्र सादर करत आहे. दोन्ही जण आपापल्या

क्षेत्रातील मान्यवर आहेत. त्यांच्या नावाला, कीर्तीला  लक्षात घेऊन लिखाण करताना खबरदारी बाळगत आहे. तरीही काही ठिकाणी माझी व्यक्तिगत मते प्रदर्शन करताना मला कोणाची तरी बाजू घेणे क्रमप्राप्त आहे. असो.

## बटेश्वरचा शिलालेख पुरावे आणि सत्यता

१. ओक लिहितात, "आग्र्याच्या काही रहिवाशांच्या मते ताजमहालपासून चार मैलांवर एक बटेश्वर असून तेथे दरवर्षी यात्रा असते."

२. डॉ. मिराशी म्हणतात, प्रस्तुत शिलालेख तो बटेश्वरचा नसून बघारीचा आहे.

३.  बघारी हे गाव हमीदपूर जिल्ह्यातील चंदेलांची राजधानी महोबा (महोत्सवपूर) हिच्याजवळ आहे. *ओक शिलालेखातील ज्या शिवमंदिराचा उल्लेख करतात ते हे बघारी येथील शिवमंदिर आहे.*

४. हा शिलालेख कनिंगहॅमला बघारी येथे एका तळ्याच्याकाठी दोन तुकड्यात सापडला. तेथून तो सुरक्षित राहण्यासाठी लखनौच्या म्युझियममध्ये नेण्यात आला असे दिसते. सध्या तो लखनौ म्युझियममध्ये आहे.

५. डॉ. राजेंद्र डोळके म्हणतात, दोन्ही जण आपापल्या क्षेत्रातील मान्यवर आहेत. त्यांच्या नावाला, कीर्तीला  लक्षात घेऊन लिखाण करताना खबरदारी बाळगत आहे. तरीही काही ठिकाणी माझी व्यक्तिगत मते प्रदर्शन करताना मला कोणाची तरी बाजू घेणे क्रमप्राप्त आहे. असो.

तूर्तास असे म्हणता येईल की जो शिलालेख लखनौच्या म्युझियममधे ठेवला आहे त्यातील वर्णन ओक म्हणतात त्या प्रमाणे ताजमहालचे असावे. मिराशींच्या मते ते शिव मंदीर महोबाच्या जवळच्या बघारीचे असावे.  जे बघारी हे गाव हमीदपूर जिल्ह्यातील चंदेलांची राजधानी महोबा (महोत्सवपूर) हिच्याजवळ आहे. ताजमहाल नक्कीच नसावे. ओक बघारीच्या शिवमंदिराला ते का लागू नसावे या संबंधी काही भाष्य करत नाहीत.




दोघांच्या दाव्यांना समजून घ्यायला सोईचे व्हावे म्हणून खालील तक्ता उपयोगी पडेल.

| पु.ना ओकांचे म्हणणे | शशिकांत ओकांचे शोधकार्य | मिराशींचे म्हणणे | शशिकांत ओकांचे शोधकार्य |
|---|---|---|---|
| बटेश्वर नामक गाव आग्र्याजवळ ४ किमीवर आहे. | सध्या बटेश्वर नावाचे उपनगर आग्रा शहरात नाही. ओकांनी हा उल्लेख नंतरच्या आवृत्तीत गाळला असल्याचे जाणवते. | ओकांचे म्हणणे अमान्य.<br><br>आग्र्यापासून ३५ मैलांवर बटेश्वर आहे. | बटेश्वर नामक गाव, मंदिरसमूह आग्र्याजवळ ६८ किमीवर आहे. |
| बघारी शिव मंदिराबद्दल काही दावा | --- | बघारी हे गाव हमीदपूर जिल्ह्यातील | सध्या महोबाजवळ २७ किमीवर सिंधणपुर बघारी गाव आहे. आसपास भटेसर नावाचे |

| | | | |
|---|---|---|---|
| करत नाहीत | | चंदेलांची राजधानी महोबा (महोत्सवपूर) च्याजवळ आहे. | गाव आहे. |
| --- | ताज महालावर ओकांनी आपले मत मांडताना १०८ मुद्दे दिले आहेत. हा त्यातला एक आहे. | बघारीत शिवमंदिर असायची **शक्यता** आहे. म्हणजे नक्की नाही. | शिलालेखातील वर्णनाला साजेसे शिवमंदिर सिंधणपुर बघारी गावात किंवा महोबा या शहराच्या आसपास  सापडत नाही. कालौघात  असे काही मंदिर असल्यास ते नष्ट झाले असावे असे मानावे लागेल. महोबाच्या आसपास  शिव आणि इतर देवी-देवतांची, जैन मंदिरे बहुधा आधुनिक काळातील असावीत, आहेत. यामुळे डॉ. मिराशींचे कथन सिद्ध होत नाही. |
| ओकांचे म्हणणे की शिलालेख ताजमहाला च्या बागेत होता. | Archaeological Survey of India Reports' (१८७४ मध्ये प्रकाशित) या पुस्तकाच्या पृष्ठ २१६-२१७, खंड ४ मध्ये जो संदर्भ मिळतो ज्यामध्ये लिहिले आहे "एक मोठा | | डॉ. राधेश्याम द्विवेदी यांचा बटेश्वर शिलालेख से उत्पन्न विरोधाभास या शिर्षकाचा लेख प्रवक्ता.कॉम वर २०१७ मधे प्रकाशित झाला होता. त्यात सर्व उल्लेख आहेत, बगरी, बघारी, भटेश्वर, बटेश्वर, बटुकेश्वर या पैकी शिलालेख कुठे सापडला असावा यावर नक्की सांगता येत नाही म्हणून ते थांबतात. |

| | | | |
|---|---|---|---|
| | चौरस काळा बलिष्ठ स्तंभ ज्याचे आधार आणि शिरोबिंदू दुसऱ्या स्तंभाचे आहेत… आता आग्र्याच्या मैदानात… हे सर्वश्रुत आहे, कधीकाळी ताजमहालच्या बागेत होते". संदर्भाचा फोटो पहा* | | कोपायलट कृत्रिम बुद्धिमत्तेने ‘देवी’ बटेश्वर शिलालेख अशी नव्या नावाची भर घातली आहे! शेवटी मूळ नोंदीकडे जावे लागेल असे म्हणून हात झाडले आहेत! तो काय म्हणतो ते वाचा.<br><br>“त्यामुळे, देवी बटेश्वर शिलालेखाच्या नेमक्या स्थानाबाबत काही गोंधळ असावा असे वाटते. उपलब्ध माहितीनुसार, हा शिलालेख मध्य प्रदेशातील बटेश्वर मंदिरांजवळ सापडला होता, उत्तर प्रदेशातील बघारीजवळ नाही. मात्र, निश्चित उत्तर मिळविण्यासाठी, जनरल कनिंघम किंवा भारतीय पुरातत्व विभागाच्या मूळ नोंदी किंवा प्रकाशनांकडे संदर्भित करणे सर्वोत्तम ठरेल.”<br><br>ते आपण नंतर वाचाल. |

आग्रा विश्वविद्यालयातील हिस्ट्री विभागाचे हेड प्रो. रामनाथ, जे आर नाथ नावाने जास्त नावाजले जातात. ते ओकांचे नाव न घेता म्हणतात, ‘जयपुरच्या राजाच्या मालकीच्या  संगमरवर खाणीतून शिळा काढून त्या मालवाहू जनावरांकडून वेळेवर पाठवल्या जात नाहीत. यावरून तंबीवजा फर्माने शहाजहांने पाठवली होती’. याचा अर्थ शहाजहांने ताजमहाल बांधला हे सिद्ध होते असा युक्तिवाद करून वीकलीमधे लेख प्रकाशित करून केला. आज जो ताजमहाल दिसतो त्यासाठी मकरानाजवळच्या संगमरवर दगडांच्या खाणीतून ते शिलाखंड जयपूरच्या

मिर्झाराजेंच्या (नंतरच्या काळात ते शिवाजी महाराजांवर चाल करून आले होते.) सत्तेला धाक दाखवून मिळवले. ओकांनी तोच मुद्दा प्रो आर नाथ  यांच्या विरोधात कसा जातो असे दाखवून दिले आहे. ते म्हणतात, 'या घटनेतून ताजमहाल इमारतीच्या पायापासून तो बांधण्यापासून सुरवात केली होती हे सिद्ध होत नाही. उलट सन १६३२मधे पायापासून बांधकामाला सुरवात झाली असे मानले तर इतक्या आधी की अजुन भिंती बांधलेल्या नाहीत अशा परिस्थितीत भिंतीना संगमरवरी टाईल्सवर कुराणातील आयते कोरून त्या चिकटवण्यासाठी तगादा करणे अप्रस्तूत दिसते'.  य़ा उलट तयार इमारतीसकट वास्तू सन १६३१ मधेच ताब्यात मिळवली असल्याने संगमरवराच्या खाणीतील दगडांना मालवाहक जनावरांवर लादून किंवा ओढत तातडीने आग्र्याला पाठवायच्या कामात सन १६३२ सालात विलंब होत आहे. अशी तंबीवजा फर्माने काढायची वेळ शाहजहांवर आली. अशी शक्यता जास्त सयुक्तिक वाटते.

## नकाशा दर्शनातून आपण मिराशींच्या वरील विधानांचा शोधून पाहू.




बटेश्वर नामक गाव, मंदिरसमूह आग्र्याजवळ ६८ किमीवर आहे.

12:57 • 25%

  Taj Mahal Agra, 52FV+W2G, D... 

 Bateshwar 

 1 hr 17 |  1 hr 22 |  — |  14 hr

Tundla
टूंडला
19
Agra
आगरा
19
Firozabad
फ़िरोज़ाबाद
Shikohaba
शिकोहाबाद
1 hr 24 min
Fatehabad
फ़तेहाबाद
Rajakhera
राजखेरा
1 hr 22 min
Bah
बाह
Ambah
अम्बाह
Porsa
पोरसा

1 hr 22 min (68 km)


सिंध(ण)नपूर
Chichara
चिचार
Sindhanpur Baghari
6 hr 3 min
27.2 km
7 hr
31.4 km
34
Mahoba
महोबा


Gadahari
गदाहरी
Sindhanpur
Baghari
सिन्धंपुर
बघारी
Patha
पथा
Saluwa
सलुवा
Gaihra
Shivhar
शिवहर
Bhatewar
भटेवर
बारी
बटेश्वर नव्हे पण
भटेवरजवळ शिवहर
नावाचा तलाव सध्या
दिसतो.




ताजमहाल ते महोबा व्हाया ग्वाल्हेर, झाशी, छत्तरपुर ३८५किमी दूर आहे. बटेश्वर मंदिसमुहासाठीला उद्देशून लिहिला गेलेला शिलालेख चा शिलालेख बघारी गावाच्या जवळील तलावापाशी सापडला असे मानले तर बघारी गावात किंवा महोबा या शहराच्या आसपास अशा वर्णनाचे मंदिर सध्या तरी उपलब्ध दिसत नाही.

"बघारीत शिवमंदिर असायची शक्यता आहे. हे मिराशींचे अनुमान घपक्याचे विधान सिद्ध होत नाही. उलट ओकांचे म्हणणे जास्त सयुक्तिक वाटते.

[महोबा - भारतकोश, ज्ञान का हिन्दी महासागर (bharatdiscovery.org)]

महोबामध्ये चंदेलांच्या काळातील काही अवशेष सापडले असून अल्हा-उदलच्या दंतकथांशी संबंधित देवालये ही येथे असल्याचे सांगितली आहे. चंदेल राजे वास्तुकलेचे शौकीन होते. त्याच्या काळात खजुराहोची जगप्रसिद्ध मंदिरे बांधली गेली. पण महोबाचे जवळजवळ सर्व महत्त्वाचे अवशेष युद्धाच्या आगीत नष्ट झाले असे दिसते. असे असले तरी राजपूतकालीन अवशेषांमध्ये येथे सापडलेली हिंदू आणि जैन धर्माशी संबंधित काही शिल्पे निश्चितच उल्लेखनीय आहेत. 'सिंहानंद अविलोकितेश्वरा'ची कोरलेली मूर्तीही सापडली, जी आता लखनौच्या संग्रहालयात आहे. मध्ययुगीन बुंदेलखंड शिल्पकलेचे हे सुंदर उदाहरण आहे.

[महोबा - भारतकोश, ज्ञान का हिन्दी महासागर (bharatdiscovery.org)]

# बटेश्वर शिलालेख से उत्पन्न विरोधाभास

## डा. राधेश्याम द्विवेदी December 27, 2017

प्राप्ति स्थल विवादास्पद :- परमार्दिदेव का विक्रम 1252- 1195 ई. का बटेश्वर अभिलेख एक प्राचीन टीले पर प्राप्त होना बताया जाता है।







प्रवक्ता.कॉम वरून मिळवलेला हिंदी भाषेतील लेख मराठी वाचकांसाठी CopilotAI मधून भाषांतरित करून सादर करत आहे. या लेखात प्रकांड पंडित डॉ. राधेश्याम द्विवेदी देखील नक्की सांगू शकले नाहीत कि बटेश्वरचा शीलालेख कुठे सापडला त्यातील श्लोकांतील वर्णन जर एका बाजूला सध्याच्या बटेश्वरच्या मंदिरांना लागू होत नाही किंवा महोबाजवळच्या शिव मंदिराना जुळत नाही पण सध्या ताज महाल म्हणवणारी वास्तूला सर्वात जास्त जुळते.

### गोंधळात भर!



वरील फोटोला पाहून जो लेखाच्या सुरवातीला छापलेला आहे. असा आभास होतो कि दोन तुकड्यात सापडलेला शिलालेख म्हणून बघारीचा शिलालेख असे वर्णन केलेल्या तुकड्यावरील मजकूर नंतरच्या काळात लिहून असा चौथऱ्यावर मांडला आहे. नेटवर शोधत असताना या शीलालेखाला ‘बटुकेश्वर’ असे नाव दिले आहे!

को पायलटने केलेले भाषांतर सुरू... प्राप्तीचे स्थान वादग्रस्त आहे: परमार्दिदेवाच्या काळातील, इ.स. ११९५ ते १२५२ दरम्यानचा बटेश्वर अभिलेख एका प्राचीन टेकडीवर सापडल्याचे सांगितले जाते. कार्लाइल यांनी १८७१-७२ मध्ये या प्रदेशाचा विस्तृत अभ्यास आणि सर्वेक्षण केले होते. त्या वेळी त्यांना हा अभिलेख सापडला नव्हता. मेजर जनरल ए. कनिंघम यांनी एएसआई अहवाल १८७३-७४, भाग ७, पृष्ठ ५ वर बटेश्वर, आग्रा येथून सापडल्याचे नमूद केले आहे. पुन्हा, मेजर जनरल ए. कनिंघम यांनी एएसआई अहवाल १८८३-८४, भाग २१, पृष्ठ ८२, क्रमांक ५२ वर बगरारीच्या तलावाच्या काठावर दोन तुकड्यांमध्ये सापडल्याचे नमूद केले आहे. बगरी हे मथुरेजवळील सिंघनपुराजवळ असल्याचे सांगितले जाते. बहुतेक अभिलेखीय पुरावे याला आग्रा जिल्ह्यातील बटेश्वरचा अभिलेख मानतात. १८८६ मध्ये, हुलुतज यांनी Zeitschrift der Morg. Ges., भाग ११, पृष्ठ ५१-५४ वर प्रतिलिपीकरण केले होते. नंतर, १८८८ मध्ये प्रो. एफ. कीलहर्न यांनी Epigraphia Indica, भाग १, पृष्ठ २०७-२१४ वर प्रकाशित केले होते. या दोन्ही संदर्भांमध्ये अभिलेखाची प्रतिकृती प्रस्तुत केलेली नाही. प्रसिद्ध पुरालेख शास्त्रज्ञ हरिहर विट्ठल त्रिवेदी यांनी या अभिलेखाला या संदर्भांशिवाय कुठेही पाहिले नव्हते. त्यांच्या विनंतीवरुन, लखनौ राज्य संग्रहालयाचे संचालकांनी या अभिलेखाच्या शाईच्या छापांची परवानगी दिली. श्री त्रिवेदी यांनी हा अभिलेख Corpus Inscriptionum Indicarum, खंड ७, भाग ३, क्रमांक १३९, पृष्ठ ४७३-४७८, प्लेट १२६ वर प्रकाशित केला आहे. अभिलेखाच्या विषयवस्तूनुसार, येथे प्राचीन विष्णू आणि शिव मंदिरांची उभारणी केली गेली होती. एक विशाल शुभ्र शिव मंदिर भगवान शिवाला इतके मोहित केले की, त्यांनी तेथे आल्यानंतर कैलासाकडे परत जाण्याचा निर्णय न केल्याचे सांगितले आहे. पूर्णिमेच्या रात्री किंवा चंद्र प्रकाश देणाऱ्या रात्री, शिवलिंगावर पडणारी प्रकाशाची किरणे रात्री श्वेत शिवलिंगाला चमकवत होती. हे मंदिर कुठे होते हे शोधाचा विषय आहे.

शुभ्र शिव मंदिर तेजोमहालय (ताजमहल): राष्ट्रवादी विचारक विष्णू मंदिराला मथुराचे द्वारकाधीश आणि शिव मंदिराला आग्र्याचे तेजेश्वर महादेव मंदिर (ताजमहल) म्हणून जोडतात. बटेश्वर शिलालेखात राजा परमार्दिदेवाच्या मंत्र्या सलक्षणाने भव्य वैष्णव आणि शैव मंदिर बांधल्याचा उल्लेख आहे. लखनऊ संग्रहालयात ठेवलेल्या ११९५ सालच्या या शिलालेखात दोन फूट रुंदी आणि एक फूट आठ इंच उंचीत नागरी लिपीतील संस्कृत भाषेतील ३४ श्लोक आहेत. शिलालेख मंदिरांच्या स्थानाबद्दल

काहीही सांगत नाही. परंतु, इतिहासतज्ज्ञ प्रा. पी.एन. ओक यांनी यात उल्लेखित शिवमंदिराला ताजमहाल म्हणून संबोधले होते. श्री. ओक यांनी आपल्या 'Tajmahal is a Hindu Temple Palace' या पुस्तकात १०० पेक्षा अधिक पुरावे आणि युक्तिवाद प्रस्तुत करून दावा केला आहे की ताजमहाल हे वास्तविक शिवमंदिर आहे ज्याचे मूळ नाव तेजोमहालय आहे. हे तेजाजीच्या नावाने बनवले गेले होते. याच्या अनुक्रमांक ३० वर बटेश्वर शिलालेखाचा उल्लेख आहे. बटेश्वर हे संस्कृत शिलालेख देखील ताज हे मूळत: शिवमंदिर असल्याचे समर्थन करते. या शिलालेखात, ज्याला बटेश्वर शिलालेख म्हणतात, शाहजहानच्या आज्ञेनुसार ११५५ सालच्या या शिलालेखाला ताजमहालच्या बागेतून उखडून टाकण्यात आले होते. इतिहासतज्ज्ञांनी आणि पुरातत्त्वशास्त्रज्ञांनी या शिलालेखाला 'बटेश्वर शिलालेख' असे नाव देऊन मोठी चूक केली आहे कारण कुठेही असे अभिलेख नाहीत की हे बटेश्वरमध्ये सापडले होते. आग्रा शहराचे नाव अंगिरस ऋषींच्या नावावरून पडले होते, अंगिरस ऋषी हे या प्रदेशात राहत होते, आणि ते भगवान शिवाचे भक्त होते, आज जिथे ताजमहाल आहे, त्या ठिकाणी हजारो वर्षांपूर्वी अंगिरस ऋषींनी शिवमंदिर बांधले होते आणि त्याचे नाव तेजोमहालय ठेवले होते, काही लोक याला अग्रेश्वर महादेव असेही म्हणत असत. वास्तविकता म्हणजे या शिलालेखाचे नाव 'तेजोमहालय शिलालेख' असावे कारण हे ताजच्या बागेत रोपले गेले होते आणि शाहजहानच्या आज्ञेने ते उखडून फेकले गेले होते. शाहजहानच्या कपटाचा एक पुरावा 'Archaeological Survey of India Reports' (१८७४ मध्ये प्रकाशित) या पुस्तकाच्या पृष्ठ २१६-२१७, खंड ४ मध्ये मिळतो ज्यामध्ये लिहिले आहे, "एक मोठा चौरस काळा बलिष्ठ स्तंभ ज्याचे आधार आणि शिरोबिंदू दुसऱ्या स्तंभाचे आहेत... आता आग्र्याच्या मैदानात... हे सर्वश्रुत आहे, कधीकाळी ताजमहालच्या बागेत होते".या शिलालेखात, ज्याला चुकीच्या पद्धतीने बटेश्वर शिलालेख म्हणून ओळखले जाते (सध्या हे शिलालेख लखनऊ संग्रहालयाच्या सर्वोच्च मजल्यावरील खोलीत संग्रहित आहे), त्यात संदर्भित केले आहे की, "एक विशाल शुभ्र शिव मंदिर भगवान शिवाला इतके मोहित केले की त्यांनी तेथे येऊन नंतर पुन्हा कधीही आपल्या मूळ निवासस्थानी कैलास परत जाण्याचा निर्णय घेतला नाही." हे अभिलेख प्रशंसात्मक स्वरूपातील स्तुतीगाथा आहे. या अभिलेखाचे तीन प्रमुख भाग आहेत - पहिल्या भागात १३ पद्ये आहेत ज्यात चंदेल वंशाच्या परंपरेचे वर्णन केले गेले आहे. दुसऱ्या भागात पद्य क्रमांक १४ ते २४ आहेत. यात राजाच्या मुख्यमंत्र्याच्या वंश परंपरेचे वर्णन केले गेले आहे. तिसरा खंड मुख्य आहे. यात पद्य क्रमांक २५ ते २९ पर्यंत अभिलेखाच्या उद्देशाचे वर्णन येते. पद्य

क्रमांक ३० ते ३४ पर्यंत लेखकाची ओळख करून दिली गेली आहे. या खंडातील पद्य क्रमांक २५ व २६ हे दोन विशाल मंदिरांच्या निर्मितीचे वर्णन करतात. या अभिलेखाचे मूळ पद्य इंग्रजी आणि हिंदीचा कोपायलटने मराठीत केलेला अनुवादही प्रस्तुत  आहे.

प्रासादो वैष्णवस्तेन निर्मितो येणाऱ्या हरिमुळे. मूद्धर्ना स्पृशती यो नित्यं पदमस्यैव मध्यमम्।।

(राजा परमादिदेवाने) विष्णूचे मंदिर उभारले, ज्यात हरीची प्रतिमा आहे, ज्याचे शिखर नेहमी त्याच्या मध्यम चालीला स्पर्श करते.

अकारयच्च स्फटिकावदातमसाविदम्मन्दिरमिन् दुमौलेः। न जातु यस्मिन्निवसन्स देवःकैलासवासाय चकार चेतः।।

आणि त्याने चंद्रमौली (शिव) साठी हे स्फटिक-शुभ्र निवासस्थान बांधले, ज्यात राहून देवाने कधीही कैलासावर राहण्याचा विचार केला नाही.

(इथे  डॉ. राधेश्याम द्विवेदी यांचा प्रवक्ता.कॉम वरील लेख संपतो.)



कै. पु. ना. ओक त्यांच्या पुस्तकात काय म्हणतात ते पाहू.



पान ६५ ते ६८ । ताजमहाल हे तेजोमहालय आहे

मिराशी व ओक वाद - ताजमहाल हे तेजोमहालय आहे। पान ६५

पक्षत्र्यक्षमुखादित्य संख्ये विक्रमवत्सरे

आश्विन शुक्ल पंचम्यां वासरे वासवे शितु: ।। ३४ ।।

राजा परमदिदेवाचा मंत्री सलक्षण (की सुलक्षण?) ह्याचा हा शिलालेख आहे. श्लोकात सांगितलेल्या वास्तू त्याने स्वतःहोऊन उभारल्या, की राजाच्या आज्ञेने उभारल्या, की राजाला संमत होतीलच अशा खात्रीने उभारल्या की राजाच्या आदेशाप्रमाणे त्या उभारण्याची व्यवस्था केली ह्याचा खल वाट- ल्यास इतिहासज्ञांनी करावा. दोघांपैकी कोणाचेही जरी ते कर्तृत्व असले तरी आपल्या सध्याच्या संदर्भात त्याचे काही महत्व नाही. मात्र आम्ही येथे असे गृहीत धरून चालतो की राजाज्ञेने मंत्र्याने वरील प्रलोकात वर्णिलेल्या दोन इमारती उभारल्या. त्या दृष्टीने श्लोक क्र. २५ चा आम्ही घेतो तो अथ असा की-

राजा परमार्ददेवाने हरीची (म्हणजे विष्णूची) मूर्ती आत प्रतिष्ठित असलेला एक राजवाडा उभारला. त्या हरीच्या मध्यम (म्हणजे प्रमुख वा उत्तम ) पदावर तो (राजा) नित्य डोके लववीत असे (श्लोक २५).

त्या (राजा) ने इंदुमौलेश्वर (शिवा) चे एक स्फटिकशुभ्र, निष्कलंक मंदिरही (इतके भव्य व शोभिवंत) बांधले की त्यात प्रतिष्ठापना झाल्या- वर शंकराला (स्वतःच्या नित्याच्या निवासस्थानी ) कैलासाला जाण्याची इच्छाच उरली नाही (श्लोक क्र. २६)

विक्रम संवत् १२१२ म्हणजे सन ११५६ आश्विन शुक्ल पंचमी, रविवार ही त्या शिलालेखाची तिथी. त्या तिथीच्या पूर्वी त्या दोन्ही इमारती बांधून पूर्ण झाल्या. (श्लोक ३४)

विक्रम संवत् हा कृस्ती सनाच्या ५६ वर्षे आधी सुरू झाला, म्हणून तेवढी ५६ वर्षे वजा घातली की शिलालेखाचा सन ११५६ येतो. त्या समयी महंमद गझनवीच्या स्वाऱ्या संपून सुमारे ४० वर्षे लोटली होती व महंमद घोरीच्या स्वाऱ्या सुरू होण्यास सुमारे ३५ वर्षांचा अवधी होता. राजा परमादिदेवाचे राज्य आग्रा, फत्तेपूर, सीक्री, मथुरा आदि नगरांच्या आसमंतात होते.

वरील संपूर्ण ३४ श्लोकांच्या शिलालेखाची माहिती एम्. डी. काळे ॲडव्होकेट, छत्रपूर, मध्यप्रदेश ह्यांनी प्रकाशित केलेल्या पुस्तिकेत आहे. पुस्तिकेची तत्कालीन किंमत ११ रु. असावी.

तो शिलालेख सन १९०० मध्ये अलेक्झेंडर कनिगहॅमला सापडला. पण हा आंग्ल अधिकारी महा धूर्त व लबाड होता. ह्याने हिंदूंना ऐतिहासिक इमारतींचे श्रेय मिळू नये म्हणून अनेक दिशाभूली नोंदी करून ठेवल्या. त्यातच हा शिलालेख आग्रा येथे ताजमहालाच्या बागेत गवसला असूनही सुमारे ७० मैल दूर असलेल्या बटेश्वर ह्या तीर्थक्षेत्री तो सापडल्याची बतावणी करण्यास त्याने त्यास कागदोपत्री बटेश्वर शिलालेख म्हटले.

वरील शिलालेखात 'विष्णोःप्रासादः' ह्याचा अर्थ विष्णूचे मंदिर असा वा. वि. मिराशी आदि आजपर्यंतच्या अनेक पुरातत्त्वविदांनी गृहीत धरला आहे तो आम्ही अत्यंत चूक समजतो. कारण त्यात पुढे 'हरिची मूर्ती असलेले ' असेही म्हटले आहे. हरीची मूर्ती असलेले विष्णु मंदिर त्याने बांधले अशी द्विरुवती शिलालेखाच्या एका ओळीत कोणीही पंडित कधीही करणार नाही. शाळकरी मुलगाही असे म्हणणार नाही की आत हरीची मूर्ती असलेले विष्णु मंदिर त्याने बांधले. कारण विष्णूचे मंदिर बांधले ह्या उक्तीतच आत विष्णूची मूर्ती होती हा अर्थ अंतर्भूत आहे. विष्णूच्या

मूर्तीशिवाय विष्णूचे मंदिर असणारच नाही. बांधले विष्णूचे मंदिर व त्यात ठेवली दुसऱ्या कोणत्या तरी देवाची मूर्ती असे कधी होणार नाहीं,

'म्हणून 'नाविष्णुः(म्हणजे न-अविष्णुः) पृथ्वीपतिः हे वचन लक्षात ठेवावे. त्यानुसार पृथ्वीपती (राजा) हा अविष्णु नसतो. म्हणजे राजा हा विष्णूच असतो. त्यानुसार वरील पंक्तीचा अर्थ असा होतो की त्याने म्हणजे राजा परमार्ददेवाने राजाचा वाडा बांधून त्यात हरीची (म्हणजे विष्णूची) मूर्ती प्रस्थापित केली व त्या मूर्तीच्या मध्यम चरणावर तो राजा नित्य डोके नमवीत असे. आग्रा नगरात एतमाद्धद्दौला म्हणून जो केशरी वर्णाच्या दगडांचा राजवाडा आहे तो राजा परमदिदेवाने बांधलेला राजवाडा होय असा आमचा निष्कर्ष आहे. जहांगीर बादशहाचा सासरा (नूरजहानचा बाप ) ह्यास एतमाद् उद्दौला पदवी होती. तो त्या वाड्यात राही. त्या वाड्यास आतून सर्वत्र रंगीबेरंगी पिवळे, हिरवे, पांढरे संगमरवर लावलेले आहेत. त्या रंगी-बेरंगी संगमरवरामुळे यमुनाकाठचा तो प्राचीन हिंदू राजवाडा झळाळतो. पुरातत्त्व खात्याच्या सूचीत त्या महालाचे एतमाउद्दौला हे नाव आहे. त्या महालाच्या भिंतीवर रंगीत चित्रकारी आहे. मुसलमानांच्या खोडीस अनुसरून त्या सुंदर महालाच्या प्रमुख खोल्यातून मुसलमानांनी दुष्ट बुद्धीने खोट्या कबरी करून ठेवल्या आहेत. उद्देश हा की त्या बागुलबोव्यामुळे हिंदूंनी पुन्हा त्या महालाचा कधीही उपयोग करू नये. परंतु त्यांपैकी कोणत्याच कबरीवर कोणाचेही नाव नाही म्हणून त्या सर्व ढोंगी कबरी आहेत. शिवाय ज्या स्तरावर शोभिवंत कबरी आहेत तो मजला नदीच्या पृष्ठभागापासून दोनतीन मजलेवर आहे. तेव्हा जमिनीपासून उंचावर चुनेगच्चीवर अथवा दगडीं फरशीवर कोणीच कधी प्रेत पुरीत नाहीं. म्हणून हिंदू महालात इस्लामी अडगळ निर्माण करण्याच्या कुटिल हेतूनेच ती फसवी इस्लामी थडगी त्या शोभिवंत प्राचीन हिंदू राजमहालात रोवण्यात आली आहेत हे स्पष्ट दिसते.

वामनावतारी बलिराजाकडून विष्णूने त्रिपाद भूमी मागितली होती. तेव्हापासून विष्णूचे मध्यम चरणावर डोके टेकण्याची म्हण रूढ झाली. परदिदेवाने आत विष्णूची मूर्ती असलेला वाडा बांधून त्यात ठेवलेल्या हरीच्या मूर्तीवर तो राजा डोके लववी असे आम्ही म्हटले आहे. पण ६०-७० वर्षापूर्वीचे पुरातत्त्वविद व संस्कृतज्ञ असा अर्थ करीत की विष्णूची मूर्ती आत प्रतिष्ठित असलेले विष्णु मंदिर इतके उंच होते की (आकाशातील ) विष्णूच्या मध्यम पदावर त्या प्रासादाचे शिखर टेकत असे. आमच्या मते तो अर्थ अनेक दृष्टीने चूक आहे. एक मुद्दा असा की

विष्णूचेच मंदिर विष्णूच्या मध्यम चरणावर स्वतःचे शिखर पूज्यभावाने टेकवी असा अर्थ लावणे हास्यास्पद आहे.

शिवाय आकाशस्थ विष्णूच्या पायाला मंदिराचे (ताठर) शिखराने जरी स्पर्श केला तरी त्यात नतमस्तक होण्याचा भाव न येता ताठरपणे आकाशातील विष्णूच्या पायाला अंकुश लागावे तसा मंदिराचा कळस टोचत होता असा विपरीत अर्थ निघेल. म्हणून स्वतःच्या प्रासादातील हरिमूर्तींच्या पायावर राजा डोके लववीत असे हाच अर्थ सर्व दृष्टीनी सयुक्तिक आहे.

आता दुसऱ्या ओळीचा अर्थ पहिल्या ओळीला अनुरूप असाच कोणीहीं लावायला हवा. तो असा की, स्वतःच्या महालात परमर्दिदेव राजाने हरीची मूर्ती स्थापन केल्यावर त्याने एक स्फटिक शुभ्र निष्कलंक (अवदात)असे इंदुमौलेश्वर (शंकराचे) मंदिरही उभारले. ते इतके लोभस होते की त्यात प्रस्थापित झालेल्या शंकराला (सांब सदाशिवाला) कैलासाला परतण्याची इच्छाच उरली नाही

वरील वर्णन 'इमारत-ए-आलिशान वा गुंबझे' (म्हणजे घुमट असलेली अद्वितीय सौंदर्याची इमारत) ह्या बादशाहनाम्यातील वर्णनाशी तंतोतंत जुळते. जी इमारत शेकडो वर्षे जगातील बहुतेक सर्वांना अत्यंत मनोहारी वाटते ती पाहून शंकरही प्रसन्न झाला ही शिलालेखातील काव्योक्ती सार्थ व मार्मिक आहे. वरील शिलालेखात इंदुमौलेश्वरेःमंदिरं इदम्' असे म्हटलेले आहे त्याचा अर्थ 'हे इंदुमौलेश्वराचे शंकराचे मंदिर' असा होतो. त्यावरून तो शिलालेख त्या मंदिराच्या आवारात म्हणजे तेजोमहालयाच्याच उद्यानात प्रस्थापित होता हा मुद्दाही महत्वाचा आहे.

गेल्या पिढीतील पुरातत्त्वविदांनी हा शिलालेख गवसल्यावरही त्या वर्णनाशी तंतोतत जुळणारी अशी ताजमहालाशिवाय अन्य इमारतच त्या परिसरात नाही हे ताडले नाही ही त्यांची चूक झाली. ह्या हेळसांडीवरून त्यांची संशोधनपद्धती किती चुकली आहे ते दिसते. अमक्या ठिकाणी मौल्यवान खजिना पुरलेला आहे असा सांकेतिक संदेश देणारा कागद मिळाल्यावर तो खजिना शोधायला जशी धावाधाव होईल तशी धावाधाव शंकरास प्रसन्न करून सोडणारे अति सुंदर स्फटिकशुभ्र निष्कलंक मंदिर राजा परमदिदेवाच्या प्रदेशात होते हे कळल्यावरही त्याचा शोध घ्यायला जे विद्वान धडपडले नाहीत, ते पुरातत्त्वविद वा इतिहासतज्ज्ञ म्हणवण्यास पात्र नाहीत असेच समजले पाहिजे. तेव्हा मौलिक शिलालेख मिळाल्यावरही त्याचा

विपरीत अर्थ लावणे व त्याच्यापासून संशोधनाचे सूत्र प्राप्त करण्याची संधी गमावणे हे सध्याच्या इतिहास संशोधन पद्धतीतील दोन ढोबळ दोष वाचकांनी लक्षात ठेवावेत.

*****************************************************

## **पद्मभूषण** डॉ. वा. वि. मिराशी

हे मराठी लेखक, संस्कृत पंडित, आणि भारतविद्यातज्ज्ञ होते. त्यांनी लिहिलेल्या पुस्तकांची आणि संशोधनात्मक लेखांची संख्या सुमारे ३०५ आहे. त्यांच्या शिक्षणाची प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण कोल्हापुरात आणि पुढच्या पुण्यात झाले. त्यांनी पुण्याच्या डेक्कन कॉलेजातून १९१७ साली संस्कृत विषयात एम.ए.ची पदवी मिळवली. अध्यापनाच्या क्षेत्रात मिराशी मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजात संस्कृतचे प्राध्यापक झाले. त्यांनी नागपूरच्या मॉरिस कॉलेजात संस्कृत अध्यासनाचे प्रमुख आणि १९४२ साली त्याच महाविद्यालयाचे प्राचार्य झाले. त्यांनी नागपूर विद्यापीठात प्राचीन भारताच्या इतिहास आणि भारतीय संस्कृती या विषयाचे मान्यद प्राध्यापक आणि मानवशास्त्र या विषयाच्या पदव्युत्तर विद्याशाखेचे प्रमुख झाले. त्यांनी विविध पुस्तकांचे अनुवाद केले आणि अनेक लेखनांमध्ये त्यांच्याबद्दल लिहिलेल्या गौरवग्रंथांमध्ये Felicitation Volume: A Collection of 42 Indological Essays Presented to V. V. Mirashi”०हे एक विशेष स्थान आहे 1.






वा. वि. मिराशी यांनी भारतीय साहित्य शास्त्र, इतिहास, भाषाशास्त्र, विदर्भ संशोधन, भारतीय संस्कृती, विद्यापीठांतर्गत अनेक प्रमुख विद्याशाखांमध्ये अद्याप त्यांच्या

पुस्तकांचा समावेश होतो. **वासुदेव विष्णु मिराशी यांना साहित्य आणि शिक्षण क्षेत्रामध्ये भरीव कामगिरी बद्दल भारत सरकारकडून सन १९७५ मध्ये पद्मभूषण पुरस्काराने सन्मानित करण्यात आले.**

## मेजर जनरल अलेक्झांडर कनिंगहॅम

इंग्रज सेनेतील वरिष्ठ अधिकारी मेजर जनरल हुद्द्यावर निवृत्त झालेले अलेक्झांडर कनिंगहॅम यांनी भारतातील सर्वत्र विखुरलेल्या वास्तूंचा तपशीलवार अभ्यास करत त्यातून आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडियाची स्थापना झाली. त्यांनी काढलेले निष्कर्ष भले नंतरच्या संशोधकांना मान्य नसोत पण त्यांनी केलेल्या शोधकामामुळे अनेक वास्तू व शिलालेख संग्रहालयातून अभ्यासाला मिळतात.



इंग्रज तसे चौकस वृत्तीचे. त्यांना पण ताज महालचा अभ्यास करावासा वाटला नाही. हे पण थोडे विपरीतच आहे. ताज महाल ह्या इमारतीला प्रसिध्दी स्वतंत्र नंतर दिली गेली का? कारण त्या वास्तूची दाखल अगोदर कोणी घेतलीच नाही. इंग्रज सरकारने देशभरातील वास्तूंवर जितके अभ्यासपूर्ण काम केले तितके आपल्या देशात अन्य राजसत्ता कडून झाले नसावे.

मुगल बादशाह आपल्या सत्ता काळातील घटना व पत्र व्यवहार वगैरे व्यवस्थित ठेवत. आपल्या सत्ता काळात ते आधीच्या बादशाहांनी त्यांच्या पुढच्या पिढीला उद्देशून केलेले वाईट किंवा निंदानालस्तीचे उल्लेख बदलले जाणे स्वाभाविक आहे. तरीही ते 'नामे' खूप माहिती सांगतात. त्यात अतिशयोक्ती, राजाची स्तुती किंवा बढाया वगैरे असणे स्वाभाविक आहे. फारसी भाषातील मजकुरात विराम चिन्हे नसणे, क्लिष्टता, आणि फाफटपसारा जास्त असे गुण अनेक अभ्यासकांनी दाखवून दिले आहेत. असो.

इंग्रजी भाषेत, तपशीलवार वर्णन, नकाशे, पुराव्यानिशी माहिती, मुद्देसूद मांडणीतून घटनांचा अर्थ अचुक समजून घ्यायला सोपे जाते. असो. त्यांच्यातील  अनेक सेनाधिकारी भारतीय संस्कृती, भाषा वगैरेत पारंगतता मिळवत. आपले थिसीस- शोधनिबंध सादर करत. त्यातूनच कनिंगहॅम सारख्या अधिकाऱ्याच्या परिश्रमातून आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया याची स्थापना झाली.

याचे दरवर्षी रेकॉर्डचे स्क्रोल प्रसिद्ध होत. ताजमहाल यावर अभ्यास करून लेखन अस्तित्वात आहे. ताजमहाल मधे सायंकाळी फिरायला व चांदण्या रात्री डीनर डान्स पार्ट्या होत. नंतर ते बंद करण्यात आले. लॉर्ड कर्झन याला ताजमहालाच्या संदर्भात फार आकर्षण होते. त्याच्या पुढाकाराने इजिप्त मधून दोन वजनदार झुंबरे- शँडलियर्स मागवले गेले पैकी एक कबरीवर लटकलेला आहे तर दुसरा प्रवेशद्वार इमारतीच्या वरील मजल्यावर लटकत आहे. एबा कोच दि कंप्लीट ताजमहाल पुस्तक परिचयात यांचे उल्लेख दिले आहेत. बागेतील झाडे, मशागत पद्धती, बदलून ती युरोपियन पद्धतीने, झाडे लावली गेली. यात तत्परतेने लक्ष घालून विविध नाम्यांचा इंग्रजी तर्जुमा करण्यात आला. फक्त शाहजहांच्या बादशाह नामा राहून गेला. म्हणून आता निर्माण झालेल्या राजकीय व धार्मिक परिस्थितीमुळे त्यातील फारसी भाषांतर करायला व योग्य अर्थ काढायला फारसे कोणी उत्सुक नाहीत. प्रस्तूत लेखकाला तसा दोन जणांचा प्रत्यक्ष अनुभव आहे. राहिला प्रश्न तळघरातील काही खोल्यांना विटांच्या बांधकामाने बंद केले आहे ते इंग्रजी सत्ता असताना का उघडून पाहिले गेले नाही यावर नेमके उत्तर मिळत नाही. इंग्रज इतकी उचक पाचक करत पण ताजमहालाच्या लांबी रुंदी, डिझाईन, याचे नकाशे आर्किऑलॉजिकल रेकॉर्ड मधे नाहीत. कनिंगहॅम कदाचित स्वतःते काम करणार असावा, जसे कुतुबमिनारचे त्यांनी केले, पण नंतर राहून गेले. असो...

डॉ. वासुदेव गोडबोले यांच्या मते त्यात इंग्रजांची कॉन्स्पिरसी होती. यावर त्यांचे पुस्तकातून माहिती थक्क करणारी आहे..

कोपायलट कृ.बु. (कृत्रिम बुद्धिमत्ता) म्हणते तसे, निश्चित उत्तर मिळविण्यासाठी, जनरल कनिंघम किंवा भारतीय पुरातत्व विभागाच्या मूळ नोंदी किंवा प्रकाशनांकडे संदर्भित करणे सर्वोत्तम ठरेल.” १८७४सालातील पुरातत्व खात्याच्या ४ क्रमांक व्हॉल्यूम मधील शिलालेख ताजमहालाच्या बागेत सापडला हा संदर्भ ताजमहाला उद्देशून असावा ही शक्यता जास्त आहे. हे काम प्रस्तुत लेखकाने खाली सादर केले आहे.

## TEXT OF REPORT ON PAGE 216 IS SHARED FOR




Report Cover Sample Vol 13

Archæological Survey of India.

REPORT FOR THE YEAR 1871-72.

DELHI,

J. D. BEGLAR,

ASSISTANT, ARCHÆOLOGICAL SURVEY OF INDIA.

AGRA,

A. C. L. CARLLEYLE,

ASSISTANT, ARCHÆOLOGICAL SURVEY OF INDIA.

UNDER THE SUPERINTENDENCE OF

MAJOR-GENERAL A. CUNNINGHAM, C.S.I.,

DIRECTOR GENERAL, ARCHÆOLOGICAL SURVEY OF INDIA.

VOLUME IV.

"What is aimed at is an accurate description, illustrated by plans, measurements, drawings or photographs, and by copies of inscriptions, of such remains as most deserve notice, with the history of them so far as it may be traceable, and a record of the traditions that are preserved regarding them."—LORD CANNING.

"What the learned world demand of us in India is to be quite certain of our data, to place the monumental record before them exactly as it now exists, and to interpret it faithfully and literally."—JAMES PRINSEP.

*Bengal Asiatic Society's Journal*, 1838, p. 227.

Opening Page Vol IV

216 ARCHÆOLOGICAL REPORT, 1871-72.

by the Rajas of Taragarh, but which was added to, altered, and occupied by Muhammadan Governors. There are also said to be old mounds or "*tilas*" at or near Jalèsar; and I am told that ancient Hindu coins are frequently found there.

Jalèsar appears to have been at one time in the possession of the *Tomar* Rajas of Taragarh.

I am told that there is a large *stone figure of a horse*, built into a wall, at Jalèsar, connected with which there is a tradition, somewhat to the following effect :—It is said that there was a Muhammadan "*Pir*" or saint at Jalèsar who was killed in some battle or affray with the Hindu Rajas of Taragarh, and that after he was killed his *horse returned* by itself to Jalèsar, and there *turned into stone;* and to commemorate this event, there is a fair held at Jalèsar every year at the spot where the *stone horse* is.

BLACK BASALTIC PILLARS FOUND AT AGRA.

Before concluding this report, it may be well that I should offer a few remarks in connection with the *great square black basaltic pillar* which, with the *base* and *capital* of *another* similar pillar, and a long ponderous *block* of similar stone, which probably formed part of the entablature over the pillars, are now in the grounds of the museum at Agra.

The *pillar* above referred to, it is well known, once stood in the garden of the Taj Mahal; and while there, for some reason or other now unknown, the shaft of the pillar used to *rock* on its base, with a slight touch of the hand, like one of the "*logan*" or rocking stones.

Besides the remains of another pillar, and the large block of similar stone, before mentioned, which are in the grounds of the museum, there are also the remains of a *third* pillar, now placed as gateposts at the gate of a European residence in the cantonments at Agra.

Now, it is said that these block pillars, when in a perfect state, along with several others, originally stood in a line outside the water-gate of the fort of Agra, between the fort and the river, but that some of them had fallen down before the most perfect and complete one of them was removed from thence and placed in the Taj garden.

These pillars were, most certainly, the work of *Hindus*, and they may be *either Jain* or *Brahmanical*, although

Vol IV Page 216

## THE BENEFIT OF READERS.

ARCHEOLOGICAL REPORT, 1871-72.

*by the Rajas of Taragarh, but which was added to, altered, and occupied by Muhammadan Governors. There are also said to be old mounds or "tilas" at or near Jalèsar; and I am told that ancient Hindu coins are frequently found there. Jalèsar appears to have been at one time in the possession of the Tomar Rajas of Taragarh.*

*I am told that there is a large stone figure of a horse, built into a wall, at Jalèsar, connected with which there is a tradition, somewhat to the following effect: It is said that there was a Muhammadan "Pir" or saint at Jalèsar who was killed in some battle or affray with the Hindu Rajas of Taragarh, and that after he was killed his horse returned by itself to Jalèsar, and there turned into stone; and to commemorate this event, there is a fair held at Jalèsar every year at the spot where the stone horse is.*

(*This much portion is not relevant to our topic* )

## BLACK BASALTIC PILLARS FOUND AT AGRA.

Before concluding this report, it may be well that I should offer a few remarks in connection with the great square black basaltic pillar which, with the base and capital of another similar pillar, and a long ponderous block of similar stone, which probably formed part of the entablature (देवळाच्या खांबांच्या वरचा भाग, कंगोरा व तुळई) over the pillars, are now in the grounds of the museum at Agra.

The pillar above referred to, it is well known, once stood in the garden of the Taj Mahal; and while there, for some reason or other now unknown, the shaft of the pillar used to rock on its base, with a slight touch of the hand, like one of the "logan" or rocking stones.

Besides the remains of another pillar, and the large block of similar stone, before mentioned, which are in the grounds of the museum, there are also the remains of a third pillar, now placed as gateposts at the gate of a European residence in the cantonments at Agra.

Now, it is said that these block pillars, when in a perfect state, along with several others, originally stood in a line outside the water-gate of the fort of Agra, between the fort and the river,

but that some of them had fallen down before the most perfect and complete one of them was removed from thence and placed in the Taj garden.

These pillars were, most certainly, the work of Hindus, and they may be either Jain or Brahmanical, although

ASI Report Volume V Page 216

वरील मजकूर मराठीत गुगलवरील भाषांतर काही शब्दात *सुधारणाकरून* सादर

आग्रा येथे काळे बेसल्टिक खांब सापडले.

हा अहवाल संपवण्याआधी, मी (मी असे म्हणणारे व्यक्ती आर्चिबाल्ड कॅम्पबेल कार्लाईल (1831–1897)आहेत.) मोठ्याचौकोनी काळ्या बेसॉल्टिक खांबाच्या संदर्भात काही टिपा देऊ केल्या पाहिजेत, ज्याचा पाया आणि (भांडवल) वरचा मुख्यभाग दुसऱ्या (समान) तशाच दिसणाऱ्या स्तंभाचा आहे आणि (समान) त्याच स्तंभांच्या दगडाचा एक लांबलचक ब्लॉक, ज्याचा कदाचित भाग बनला आहे. खांबांवरील शिलालेख आता आग्रा येथील संग्रहालयाच्या (मैदानात) आवारात आहेत.

(तो) *स्तंभ आमचे सर्वेक्षण होतानाच्या काळात - जो ताजमहालाच्या बागेतील परिसरात आहे* - हे सर्वज्ञात आहे वरील स्तंभाचा उल्लेख आहे, , तो (एकदा) *पूर्वी कधीतरी* ताजमहालच्या बागेत उभा होता; आणि तिथे असताना, (आता) *सध्या* अज्ञात, काही कारणास्तव, स्तंभाच्या *मधल्या दांड्याचा भाग* (शाफ्ट) त्याच्या (पायावर), *लटकलेल्या भागावर* हाताच्या किंचित (स्पर्शाने) *धक्क्याने*, एखाद्या "लोगन") *लिची फळाच्या झुपक्याप्रमाणे* किंवा दगडी (लोलक- *गोटी*) दगडांप्रमाणे डोलत असे. {वरील शब्दांचा संदर्भ, अर्थ कसा लावता येईल यावर विचार व्हायला हवा - शशिकांत ओक}



Table 1 **(लोगन) लिची फळाच्या झुपक्याचे चित्र**

संग्रहालयाच्या मैदानात असलेल्या दुसऱ्या स्तंभाचे अवशेष आणि तत्सम दगडाचा मोठा खंड, ज्याचा उल्लेख आधी केला आहे, त्याशिवाय, तिसऱ्या स्तंभाचे अवशेष देखील आहेत, जे आता

आग्रा येथील छावण्या*तील*.युरोपियन निवासस्थानाच्या गेटवर गेटपोस्ट म्हणून ठेवलेले आहेत. (सध्याच्या काळात आर्मी कँटोनमेंटमधे असे स्तंभ कुठे सापडतात याचा शोध घेतला पाहिजे.)

आता अ*शी आख्यायिका आहे* की हे खांब (परिपूर्ण) द*र्शनीय* अवस्थेत असताना, इतर अनेकांसह, *खांबांच्या जोड्या* (मूळतः) *आधीच्या कालखंडात* आग्रा किल्ल्याच्या पाण्याच्या दरवाजाबाहेर, किल्ला आणि नदीच्या दरम्यान एका रांगेत उभे होते, परंतु त्यापैकी काही पूर्ण होण्यापूर्वी खाली पडले आणि तेथून काढून ताज बागेत ठेवले.

हे स्तंभ नक्कीच हिंदूंचे कार्य होते आणि (तरीही)ते जैन किंवा (ब्राह्मणवादी) {म्हणजे कसे ?} असू शकतात. (अशी गोंधळात टाकणारी विधाने केल्याने कार्लाईल यांच्या कष्टपूर्वक केलेल्या कामाला गालबोट लागते- प्रस्तूत लेखक)

आधी पूर्ण श्रेय हिंदूंना द्यायचे व पुढल्या वाक्यात संशय दारववून पाचर मारायची हे तंत्र कनिंगहॅम यांच्या प्रचंड शोधकार्यातील वैगुण्य मानावे लागेल. अशीच मखलाशी दिल्लीतील कुतुबमिनार वास्तूचे शोधकार्याचे वर्णन करताना जनरल कनिंगहॅम यांनी केलेली दिसते.



